**पहुरपेठ ता. जामनेर जि. जळगाव येथे वाघुर नदीवर केवडेश्वर महादेव मंदीराच्या जवळ पूर संरक्षक भिंत बांधण्यास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.**

**<u>महाराष्ट्र शासन</u>**
**जलसंपदा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: प्रशामा-२०१७/ (प्र.क्र. ८४/२०१७)/ सिं.व्य.(महसूल)**
मंत्रालय, मुंबई ४०००३२,
दिनांक: २० एप्रिल, २०१७.

<u>वाचा</u> : १) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव यांचे पत्र क्र.कासं/तापाविमं/प्रशा-७/६०४/२०१७, दि. ६.२.२०१७.

<u>प्रस्तावना</u> :-

तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव अंतर्गत पहुरपेठ, ता. जामनेर, जि. जळगाव हे गांव वाघुर नदीच्या तीरावर वसलेले आहे. वाघुर नदी ही तापी नदीची प्रमुख उपनदी आहे. वाघुर नदीला येणाऱ्या पूरामूळे केवडेश्वर महादेव मंदीराच्या अवतीभवती मोठया प्रमाणावर नुकसान होते व भाविकांमध्ये भितीचे वातावरण निर्माण होते. यामुळे नदीकाठावरील केवडेश्वर महादेव मंदीर व जनतेच्या व भाविकांच्या जिवीतास हानी होऊ नये याकरीता हे काम करणे आवश्यक आहे. सदर कामाची मागणी ग्रामपंचायत, पहुरपेठ, ता.जामनेर यांना ठराव क्र. ६/५ , दि. १.५.२०१६ नुसार केलेली होती. सदर मागणीच्या अनुषंगाने प्रत्यक्ष कार्यक्षेत्रावर पूर संरक्षक कामाचे नियोजन क्षेत्रिय अभियंत्यांनी करून प्रस्ताव शासनास सादर केला. उपरोक्त बाबी विचारात घेता वाघुर नदीच्या उजव्या तटावर केवडेश्वर महादेव मंदीराच्या जवळ पूरसंरक्षक भिंत बांधण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

<u>**शासन निर्णय :-**</u>

तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव अंतर्गत पहुरपेठ, ता. जामनेर, जि. जळगाव येथे वाघुर नदीवर केवडेश्वर महादेव मंदीराच्या जवळ नदीच्या उजव्या तटावर पूरसंरक्षक भिंत बांधण्याच्या कामासाठी रू. ८३,०७,५२९/- व अनुषंगिक खर्च रू. २,४८,३२६/- अशा एकूण रू. ८५,५५,८५५/- (रू. पंच्याऐंशी लक्ष पंचावन्न हजार आठशे पंचावन्न फक्त ) एवढया खर्चाच्या किंमतीस खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) शासन परिपत्रक क्र.एफडीडब्ल्यु-१०९२/(१७०)/सिं.व्य.(कामे), दि.७.८.१९९२ नुसार कार्यवाही करावी.

ब) अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे/ संकल्पने, दरसूची बाहय बाबी व वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

क) कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करावयाचा आहे.

ड) शासन परिपत्रक क्र. एफडीडब्ल्यू-१०८९/२४३/८९/सिंव्य (कामे), दि. २१.९.१९८९ नुसार पुर रेषा आखणी केल्यानंतरच पूर संरक्षक भिंतीची संरेखा निश्चित करावी.

इ) भिंतीच्या बांधकामासाठी भूसंपादन करू नये, बांधकामासाठी आवश्यक जमीन संबंधीतांनी विनामोबदला उपलब्ध करून द्यावी, पूर संरक्षक भिंतीच्या बांधकामामुळे नदीप्रवाहाला अडथळा निर्माण होणार नाही याची दक्षता घ्यावी.

ई) पूर संरक्षक योजना राबविल्यानंतर परिसरातील पाण्याचा निचरा योग्य पध्दतीने होईल याची दक्षता नियोजनात घ्यावी.

प) सदर योजना पूर्ण झाल्यानंतर पूर संरक्षक भिंत पहुरपेठ, ता. जामनेर ग्रामपंचायतीने ताब्यात घेऊन भविष्यातील देखभाल व दूरूस्ती करावयाची आहे. काम सुरू करण्यापूर्वी तसे लेखी बंधपत्र पहुरपेठ ग्रामपंचायतकडून प्राप्त करून घ्यावे.

फ) सदरच्या कामांचा कार्यारंभ आदेश काढण्यापासून कामे पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करून द्यावे.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७११ पुरनियंत्रण प्रकल्पावरील भांडवली खर्च, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) (०२) तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव भागभांडवली अंशदान (४७११ ०२१८) या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य. (महसुल) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. ८/सन २०१७-१८ वर नोंदविण्यात आलेली आहे.

प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकार व आंतरवित्तीय सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२०१५५९०४३०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjiv Arunkant Tatu

Digitally signed by Sanjiv Arunkant Tatu
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2d4c9d30f88b6a2745465552d33743e7c967f8c7a5d287520a1c61013a9d322a, cn=Sanjiv Arunkant Tatu
Date: 2017.04.20 16:02:43 +05'30'

( सं. अ. टाटू )
शासनाचे उपसचिव

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,

२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,

३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई

४) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,

५) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई,

६) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई,

७) मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,

८) प्रधानसचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,

९) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

१०) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरी क्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,

११) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरी क्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,

१२) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव,

१३) मुख्यअभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव,

१४) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,

१५) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, जळगाव,

१६) कार्यकारी अभियंता, जळगाव पाटबंधारे विभाग, जळगाव,

१७) सिं.व्य.(महसूल) कार्यासन संग्रहार्थ.